चिंचवाडी लघु पाटबंधारे,
प्रकल्प ता.राजापूर ,जि.रत्नागिरी,
या योजनेस द्वितीय सुधारीत
प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग,
शासन निर्णय क्र. लपायो -२०१९/(प्र. क्र.१७५/२०१९)/खारभूमी
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २७ डिसेंबर, २०२१

पहावे :-

१) शासन निर्णय जलसंपदा विभाग, क्र. लपायो /२००५/(३९३/२००५)/खारभूमी, दिनांक : २८.१०.२००५.

२) शासन निर्णय जलसंपदा विभाग, क्र. लपायो /२०१०/(५५३/२०१०)/खारभूमी, दिनांक : ०४.०७.२०१२

३) कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे यांचे पत्र क्र. कोंपाविम/तां.४/ चिंचवाडी सु.प्र.मा./३५७४/ सन २०१९, दिनांक: १०.१०.२०१९ चे पत्र

४) वित्त विभागाचे पत्र क्र.व्यअस-२०२१/ प्र.क्र.१४३/ अर्थ-२ दि.०९ डिसेंबर, २०२१

प्रस्तावना:-

चिंचवाडी लघु पाटबधारे योजनेअंतर्गत मौजे पांगरे बु. ता.राजापूर, जि. रत्नागिरी येथे ६.३९ दलघमी क्षमतेचे मातीचे धरण बांधण्यात आले आहे. हा प्रकल्प कोंकण पाटबंधारे विकास महामंडळाअंतर्गत " उर्वरित महाराष्ट्र " या प्रदेशामध्ये आहे. या प्रकल्पाद्वारे राजापूर तालुक्यातील पाच गावातील एकूण ३९० हे. क्षेत्रास बंदिस्त नलिकेद्वारे सिंचनाचा लाभ देणे नियोजित आहे.

सदर योजनेस संदर्भाधिन क्र.२ येथील दि. ०४/०७/२०१२ च्या शासन निर्णया अन्वये प्रादेशिक दरसूची सन २००९-१० नुसार रु. ३८६८.६४ लक्ष रकमेस प्रथम सुधारित प्रशासकिय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदर प्रकल्पाच्या सन २०१६-१७ च्या दरसुचीवर आधारीत रु. ५०९३.९८ लक्ष किंमतीच्या व्दितिय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रस्तावाबाबत, राज्य तांत्रिक सल्लागार समिती.-२ (SLTAC-II) च्या दि. २८/०८/२०१९ रोजी झालेल्या ३४ व्या बैठकीत छाननी अहवालातील १ ते २७ मुद्दे विचारात घेण्याच्या अधीन राहून, समितीकडुन शिफारस करण्यात आली आहे.

हा प्रस्ताव व्यय अग्रक्रम समितीच्या दि.२५.नोव्हेंबर,२०२१ च्या बैठकीत ठेवण्यात आला होता. व्यय अग्रक्रम समितीने सद्य:स्थिती, दरसूचीतील बदल, नवीन भूसंपादन कायदा, भूसंपादन खर्चात झालेली वाढ, संकल्पचित्रातील फेरबदल, गौण खनिज शुल्काच्या दरात झालेली सुधारणा इत्यादि किंमतवाढीची कारणमिमांसा यांचा सखोल परामर्श घेऊन चिंचवाडी लघु पाटबधारे प्रकल्प, ता.राजापूर, जि. रत्नागिरी या प्रकल्पास जलसंपदा विभाग दरसूची २०१६-१७ वर आधारित रु.५०९३.९८६ लक्ष किंमतीस द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यास मान्यता दिली आहे. त्यास अनुसरून शासन पुढील आदेश निर्गमित करीत आहे.

शासन निर्णय :-

चिंचवाडी लघु पाटंबधारे प्रकल्प, ता.राजापूर, जि. रत्नागिरी या प्रकल्पास जलसंपदा विभाग दरसूची २०१६-१७ वर आधारित रु. ५०९३.९८६ लक्ष ( अक्षरी रुपये पाच हजार त्र्यान्नव लक्ष व अठ्ठ्यान्नव हजार फक्त ) किंमतीस [प्रत्यक्ष कामासाठी रु. ४७०९ लक्ष व अनुषंगीक खर्च ३८५ लक्ष] खालील अटींच्या अधीन राहून द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. प्रकल्पाचा उपशिर्ष निहाय तरतूदींचा गोषवारा परिशिष्ट - "अ" मध्ये सोबत जोडला आहे.

१) सदर प्रकल्पाच्या द्वितीय सु प्र मा प्रस्तावामध्ये अंतर्भुत किंमतीस तांत्रिक मान्यता प्राप्त करुन घ्यावी.

२) "चिंचवाडी लघु पाटंबधारे प्रकल्प, ता.राजापूर, जि. रत्नागिरी" या प्रकल्पाची द्वितीय सुधारीत प्रशासकीय मान्यता म्हणजे प्रकल्प कार्यान्वित करण्याच्या विविध टप्प्यांवर क्षेत्रीय अधिकाऱ्यांनी घेतलेल्या विविध निर्णयांस व क्षेत्रीय अनियमितता झाली असल्यास अशा अनियमिततेस सहमती असल्याचे गृहीत धरता येणार नाही तसेच प्रकरणाची तपासणी त्यावेळच्या क्षेत्रिय कार्यालयाची राहील .

३) योजनेची अंमलबजावणी करताना प्रचलीत शासन निर्णय, नियम, CVC तत्वे, वित्तीय मर्यादा, विहित निविदा कार्यपध्दती अनुसरणे याची सर्वस्वी जबाबदारी संबंधीत क्षेत्रिय कार्यालयांची राहील.

४) द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याच्या निर्णयामुळे या प्रकल्पाबाबत सुरु असलेल्या अथवा भविष्यात उद्भवणाऱ्या विभागीय चौकशीच्या कार्यवाहीस कोणतीही बाधा पोहोचणार नाही, ती कार्यवाही तशीच चालू ठेवावी.

५) संपूर्ण प्रकल्प हा द्वितीय सु. प्र. मा. किंमतीच्या मर्यादेत पूर्ण करावा.

या प्रकल्पाच्या कामावरील खर्च मागणी मुख्य लेखाशीर्ष "४७०२ लहान पाटबंधारे यावरील भांडवली खर्च, ८००-इतर खर्च (१), सर्वसाधारण लघु पाटबंधारे योजना (१) " या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि तो मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या (कार्यासन १४३४) अनौपचारिक संदर्भ क्र.७० /२०२१ , दिनांक १६ /०६/२०२१ अन्वये तसेच वित्त विभागाच्या (कार्यासन व्यय-१२) अनौपचारिक संदर्भ क्र.१९७/२०२१, दिनांक २०/ ०७ /२०२१ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार तसेच दिनांक २५/११/२०२१ रोजी झालेल्या व्यय अग्रक्रम समितीच्या बैठकीमध्ये झालेल्या निर्णयाच्या अनुषंगाने निर्गमीत करण्यात येत आहे.

या योजनेस प्रदान करण्यात आलेली द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता लपा कार्यासनाच्या प्रशासकीय मान्यता नोंदवहीत २१९ या अनुक्रमांकावर नोंदविण्यात आली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२११२२७१२४९२६९९२७ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

अमोल फुंदे

(अमोल फुंदे)
शासनाचे उप सचिव

सहपत्र :- परिशिष्ट "अ" व "ब"

प्रत,

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, याचे सचिवमुंबई
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, यांचे प्रधान सचिव मुंबई
३. सर्व मा. मंत्री / मा. राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
४. मा. विरोधी पक्ष नेते, विधानपरिषद/ विधानसभा महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
६. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
७. वित्त विभाग (व्यय- १२), मंत्रालय, मुंबई -३२.
८. नियोजन विभाग (कार्यासन १४३४), मंत्रालय, मुंबई -३२.
९. जिल्हाधिकारी, रत्नागिरी
१०. कार्यकारी संचालक, कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे
११. महासंचालक, संकल्पचित्र, प्रशिक्षण, जलविज्ञान, संशोधन व धरण सुरक्षा, नाशिक.
१२. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोंकण प्रदेश, मुंबई
१३. आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१४. उप सचिव (निवसं), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
१५. अधिक्षक अभियंता, रत्नागिरी पाटबंधारे मंडळ, रत्नागिरी
१६. अर्थ शाखा - १ व २, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
१७. खारभूमी कार्यासन/ कार्यासन लपा, (संग्रहार्थ) ....

## परिशिष्ट-अ

(शासन निर्णय जलसंपदा विभाग क्र. लपायो -२०१९/(प्र. क्र.१७५/२०१९)/खारभूमी, दिनांक: २७ डिसेबर,२०२१ चे परिशिष्ट)

### चिंचवाडी लघु पाटंबधारे . ता.राजापूर, जि. रत्नागिरी द्वितीय सुधारीत प्रशासकीय मान्यता उपशिर्षनिहाय तरतूदी

| अ.क्र. | उपशिर्ष | द्वितीय सुप्रमा नुसार तरतुद (दरसूची सन २०१६-१७) रू. लक्ष |
|---|---|---|
| अ) शिर्ष कामे | | |
| १. | अे - प्राथमिक | २६.८५८ |
| २. | बी - भूसंपादन | ६२१.९३७ |
| ३. | सी - मुख्य कामे | २४६७.९१५ |
| ४. | डी - विमोचक | ३७५.७५९ |
| ५. | जी.पूल | ०.०३० |
| ६. | के-इमारती | ५.९८० |
| ७. | एम-वृक्षारोपण | २.७५८ |
| ८. | ओ-संकीर्ण | ६.५२७ |
| ९. | पी-देखभाल दुरुस्ती | ८.७९० |
| १०. | आर-रस्ते | २२९.८६ |
| ११. | एक्स- पर्यावरण | १.००० |
| | **एकूण शिर्षकामे (अ)** | **३७४७.४१४** |
| ब) कालवे व वितरण व्यवस्था | | |
| १. | अे - प्राथमिक | ११.७१० |
| २. | बी - भूसंपादन | ३७.२२ |
| ३. | डी- विमोचक | ०.००० |
| ४. | ई-प्रपात | ०.००० |
| ५. | एफ-मोरीकामे | ०.००० |
| ६. | जी-पुल | ०.००० |
| ७. | एच-निकास | ०.००० |
| ८. | के-इमारती | ०.००० |
| ९. | एल मातीकाम/PDN | ६३९.२११ |
| १०. | एम-वृक्षलागवड | ०.००० |
| ११. | ओ-संकीर्ण | ६.१४५ |
| १२. | पी-देखभाल | ८.९७६ |
| १३. | आर- दळणवळण | ०.००० |
| १४. | यु-वितरिका | २५८.३८० |
| १५. | व्ही-शेतचारी | ०.००० |
| १६. | डब्लू- निचराचारी | ०.००० |
| १७. | एक्स-पर्यावरण | ०.००० |
| | **एकूण (ब)** | **९६१.६४२** |
| **एकूण कामे (अ+ब)** | | **४७०९.०५६** |
| **क) अनुषंगीक खर्च** | | **३८४.९३०** |
| **एकूण (अ+ब+क)** | | **५०९३.९८६** |

## परिशिष्ट-ब

(शासन निर्णय जलसंपदा विभाग क्र. लपायो -२०१९/(प्र. क्र.१७५/२०१९)/खारभूमी, दिनांक: २७ डिसेबर,२०२१ चे परिशिष्ट)

| | | |
|---|---|---|
| १. | चिंचवाडी योजनेची सिंचन क्षमता | ३९० हे. |
| २. | योजनेचा पाणीसाठा | ६.२८ द.ल.घ.मी |
| ३. | लाभव्यय गुणोत्तर | १.04 (मापदंड 1 पेक्षा अधिक मापदंडात बसते) |
| ४. | आर्थिक परतावा दर | ७.४% ( मापदंड १२ % पेक्षा अधिक) योजना मापदंडात बसत नाही |
| ५. | पाणीसाठा किंमत | रू. ८१,११४/- प्रति सघमी प्रचलित मापदंड रू १,७६,७२० पेक्षा कमी) योजना मापदंडात बसते. |